मौदा पंचायत समिती जिल्हा नागपूर प्रशासकीय इमारतीच्या परिसराला आवारभिंत बांधकाम व परिसर सुधारणा करण्याच्या उपकामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१८/प्र.क्र. २०१/बांधकाम-४
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: **२४** जानेवारी, २०१९

वाचा :-

(१) शासन निर्णय क्र. पंसई २००९/ प्र.क्र.१८१/ पंरा-७, दिनांक १.०१.२०१०

(२) कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद, नागपूर यांचे पत्र क्र. जिपना/ बांध/का-२/(१)/१०८१/१८, दि. १२.०२.२०१८

प्रस्तावना :-

कार्यकारी अभियंता (बांध.) , जिल्हा परिषद, नागपूर यांनी वरील संदर्भीय पत्रान्वये मौदा पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या उपकामांस प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. मौदा पंचायत समिती जिल्हा नागपूर नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास दिनांक १.०१.२०१० च्या शासन निर्णयान्वये रु. १९४.४६ लक्ष इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली असून प्रशासकीय मान्यते एवढा निधी जिल्हा परिषदेला वितरीत करण्यात आलेला आहे. मौदा पंचायत समितीकरीता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम मंजूर करतेवेळी अंदाजपत्रकामध्ये परिसराला आवारभिंत बांधकाम व परिसर सुधारणा कामांचा समावेश करण्यात आलेला नव्हता. त्यामुळे, कार्यकारी अभियंता (बांध.) , जिल्हा परिषद, नागपूर यांनी सदर उपकामाचे रुपये ५०.८७ लक्ष इतक्या किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सदरील अंदाजपत्रकांस कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद नागपूर यांची तांत्रिक मान्यता घेण्यात आली आहे.

३. कार्यकारी अभियंता (बांध.) , जिल्हा परिषद, नागपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती मौदा पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या परिसराला आवारभिंत बांधकाम व परिसर सुधारणा करण्याच्या उपकामांस प्रशासकीय मान्यता देण्याच्या रुपये ५०.८७ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

४. मौदा पंचायत समिती जिल्हा नागपूर प्रशासकीय इमारतीच्या परिसराला आवारभिंत बांधकाम व परिसर सुधारणा करण्याच्या उपकामांस एकूण रक्कम रुपये ५०,८७,०००/- (रुपये पन्नास लक्ष सत्त्याऐंशी हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामास पुढील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) मौदा पंचायत समितीच्या ठिकाणी उपकामे करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

३) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

५. मौदापंचायत समिती प्रशासकीय इमारतीच्या उपकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| FINAL GENRAL ABSTRACT FOR MOUDA BLDG., COMPOUND WALL & SUBWORK | | |
|---|---|---|
| Sr. No | Description of item | Amount (in Rs.) |
| **1** | Cost of Compound Wall & Cycle Stand | 4463270.00 |
| 2 | Add for GST @ 12 % | 535600.00 |
| 3 | Add for Quality Monitoring Charges | 22608.00 |
| 4 | Add for Contingency Charges | 65522.00 |
| | Total | 5087000.00 |

६. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च " **२५१५**-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम **१०१**, पंचायती राज **३१** सहाय्यक अनुदाने **(०१) (०३)** जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने **(२५१५ ००५३)** " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

८. प्रस्तुत कामाची माहिती कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर अद्ययावत करावी.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०१२४१३१७४८०६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2019.01.24 18:01:05 +05'30'

( दि.बा.पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो./ मु.मं.ग्रा.स.यो., मध्यवर्ती इमारत, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर
५) कार्यकारी अभियंता (बांध.) , जिल्हा परिषद नागपूर
६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर
७) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नागपूर
९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१०) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नागपूर विभाग, नागपूर
११) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नागपूर
१२) सभापती, पंचायत समिती, मौदा, जिल्हा नागपूर
१३) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, मौदा, जिल्हा नागपूर
१४) निवडनस्ती-बांधकाम-४ ग्रा.वि. वि. बांधकाम भवन फोर्ट मुंबई-४०० ००१